**महाराष्ट्र शासन व टाटा ट्रस्ट यांच्यामध्ये झालेल्या सामंजस्य करारानुसार नवीन स्वीय प्रपंजी लेखा खाते पुढे चालू ठेवण्यास मुदत वाढ देण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्र. जेएलएम-०६१६/प्र.क्र.१६६/तुरुंग-२**

दुसरा मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १७ डिसेंबर, २०१९.

वाचा:

१. गृह विभाग, शासन निर्णय क्र. जेएलएम-०६१६/प्र.क्र.१६६/तुरुंग-२, दिनांक ७.१०.२०१६.

२. अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.अपोसंवकामनि/पुणे/क-५/टाटा ट्रस्ट करार/२०१९/९७६४, दिनांक ५.१२.२०१९.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र शासन व टाटा ट्रस्ट यांच्यामध्ये दिनांक ३१.३.२०१६ रोजी राज्यातील कारागृहातील बंद्यांसाठी प्रायोगिक प्रकल्प राबविण्यासाठी झालेल्या सामंजस्य करारानुसार प्रायोगिक प्रकल्प राबविण्यासाठी लागणारा निधी टाटा ट्रस्ट, मुंबई शासनाकडे जमा करण्यात येणार आहे. त्यानुसार स्वीय प्रपंजी लेखा खाते फक्त ३ वर्षासाठी राहील या अटींच्या अधीन राहुन संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात आली आहे. सदर खात्यास माहे ऑक्टोबर,२०१९ मध्ये ३ वर्षे पूर्ण झालेली आहेत. संदर्भीय क्र.२ येथील पत्रान्वये अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी स्वीय प्रपंजी लेखा खाते पुढे चालू ठेवण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे नावे स्वीय प्रपंजी लेखा खाते ३० जानेवारी, २०२० पर्यंत चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

टाटा ट्रस्ट, मुंबई हे शासनाकडे जमा करणार असलेल्या निधीसाठी अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे नावे स्वीय प्रपंजी लेखा खाते अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, पुणे यांच्या नावे उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी लेखा खात्याच्या व्यवहारांचे ताळमेळ (reconciliation) व परिक्षण याची सर्वस्वी जबाबदारी संबंधितांची राहील, या अटीच्या अधीन ३० जानेवारी, २०२० पर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.अनौस.४०२/२०१९/ कोषा-प्रशा-५, दिनांक ११.१२.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१२१७१३१०५६४०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Siddharth Vidyadhar Dhandore

Digitally signed by Siddharth Vidyadhar Dhandore
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=18c12c8352414c8a8937fd0998c9ca8d81b7ea489acfd971bb6de950e8d1d54f, serialNumber=5d16166df09e111cba9c7d5e4e321b340111df7b21c5b0fff0be638e80ea9a1b, cn=Siddharth Vidyadhar Dhandore
Date: 2019.12.17 13:16:40 +05'30'

**( सि. वि. धांडोरे )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

**प्रत,**

१. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. महालेखापाल ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१, मुंबई,
३. निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
५. कारागृह उपमहानिरीक्षक, मुख्यालय, पुणे,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
७. अवर सचिव, (विनियम/व्यय ८/कोषा प्र.५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
८. सह सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
९. प्रकल्प संचालक, प्रयास, सर दोराबजी टाटा ट्रस्ट, बॉम्बे हाऊस, २४ होमी मोदी स्ट्रीट, मुंबई,
१०.अपर मुख्य सचिव (गृह), यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. अपर मुख्य सचिव (अ. व सु.) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२.निवड नस्ती तुरुंग-२.

--------------